व्लादीमिर मायकोव्स्की



एक छोटा मुलगा
आला वडिलांपाशी
आणि म्हणाला: "बाबा बाबा,
सांगा पाहू चांगलं काय
नि वाईट काय?"

लाडक्या मुलांनो,
गुपित नाही तुमच्यापासून
बाबांनी
त्याला जे सांगितले,
शब्द न् शब्द
पुस्तकात या मी उतरवले.





"जर वारा

सुटला सुसाट

अन् गारांनी मांडला थयथयाट,

अशा वेळी सारे

उत्तम जाणतात

वाईट असते

भटकणे रस्त्यात.



पाऊस संपला,
मेघांना सारून
निळया नभात
सूर्य चमकला,
अशा वेळी
साऱ्यांनाच चांगले
असोत थोर
किंवा सानुले.



जर
वेड्या मुलाने
माखली शाई अंगभर
बरबटले हात-तोंड
घाणीने ढीगभर,
कातडीला अपाय
बाळाच्या होतो नक्की
ध्यानात ठेवा
गोष्ट ही पक्की.



जर
मुलाने दररोज
आंघोळ केली साबणाने
अन् घासले दात
दंतमंजनाने,
मुलगा चांगला
म्हणतात त्याला
खूप खूप
आवडतो आम्हाला.





जर
कुणी दुष्ट मुलगा
दुबळ्याला पिटी,
नको वाईट
असा मला,
पुस्तकातून करीन त्याची कट्टी.

"खबरदार!"
म्हणून जो ओरडतो
"आपल्यापेक्षा छोटयांना
मारू नये" म्हणतो!
चांगला मुलगा त्यालाच म्हणतो
गळयातला साऱ्यांच्या ताईत तो बनतो!





जर
फाडलेस पुस्तक
तोडलेस खेळणे
घातलास गोंधळ सगळीकडे,
वेडा-वाईट असा कसा तू
एकमुखाने म्हणतील मुले.



आवडते ज्याला
करायला काम
पुस्तकातले धडे
वाचतो जो छान,
म्हणतात त्याला
मुलगा चांगला.





छोटयाशा कावळयाला
भिऊन जो ओरडतो
अन् पाठीला पाय
लावून धूम जो पळतो,
भित्री-भागुबाई
त्याला म्हणती
वाईट आहे
असली ख्याती.



चिखलात हुंदडून
दाणदाण
मळवून सदरा
घाणेघाण,
वाईट अशा मुलापासून
रहा म्हणतात जरा जपून.



असला लहान
जरी हा बिट्टा
आपले बूट
पॉलिश करी पठ्ठा.
धुतो हात-पाय
घेऊन पाणी
चांगला आमचा
बाळ गुणी.



म्हणून
प्रत्येक मुलाने
नेहमी ध्यानात ठेवावे –
राहतो घाण
जो लहानपणी
बनतो घाणेरडा
तो मोठेपणी !”

ऐकून
बोलणे बाबांचे
खूष बेटा छोटा झाला
निश्चय त्याने मनाशी केला :
“चांगलं काम
सदा करीन,
वाईटापासून
दूर राहीन !”



